**ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद (स्टेट कौन्सील फॉर ओल्डर पर्सन) गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. ज्येष्ठना-२०१६ /प्र.क्र.७९/सामासु**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. ३१ ऑक्टोबर, २०१९

वाचा- (१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे दि. १६ एप्रिल, २००४ रोजी जाहिर केलेले राज्याचे ज्येष्ठ नागरिक धोरण-२००४

(२) आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम २०१०, दि. २३ जून, २०१० ची अधिसूचना

(३) दि. ३० सप्टेंबर, २०१३ रोजी मा. मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्य केलेले राज्याचे सर्वसमावेशक धोरण- २०१३

(४) सामाजिक न्याय विभाग, शा.नि.क्र.ज्येष्ठना- २०१६/प्र.क्र.७९/सामासु, दि. २६ मे, २०१६

**प्रस्तावना-**

राज्यातील ज्येष्ठ नागरिकांच्या समस्या विचारात घेऊन त्यांना त्यांचे जीवन सुसह्यपणे जगता यावे ही बाब विचारात घेऊन ज्येष्ठ नागरिकांना विविध सवलती देण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक धोरणास दि. ३० सप्टेंबर, २०१३ रोजी मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम,२०१० दि. २३ जून, २०१० च्या अधिसूचनेद्वारे प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर नियम २०१० मधील २१ नुसार मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद स्थापन करण्याबाबत तरतूद आहे. त्यानुसार शासन निर्णय दि. २६ मे, २०१९ अन्वये ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद गठीत करण्यात आलेली होती. तथापि, सदरच्या परिषदेत नियम २१ अन्वये सदस्यांची पुर्तता होत नसल्यामुळे सदरचा शासन निर्णय दि. २६ मे,२०१९ अन्वये गठीत करण्यात आलेली ज्येष्ठ नागरिक राज्य परिषदमध्ये सुधारणा करुन नव्याने ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम, २०१९ दि. २३ जून, २०१० च्या अधिसूचनेमधील नियम २१ नुसार, मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद उपरोक्त नमूद दि. २६ मे, २०१९ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली आहे. तथापि, सदर शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

आई-वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम २०१० मधील नियम २१ मधील तरतुदीनुसार मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली खालीप्रमाणे "**ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद**" **(स्टेट कौन्सील फॉर ओल्डर पर्सन)** नव्याने गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री (सामाजिक न्याय) | पदसिध्द अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव सामाजिक न्याय विभाग, गृह विभाग/परिवहन विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग, वैद्यकीय शिक्षण विभाग, शालेय शिक्षण विभाग, नगर विकास विभाग, ग्राम विकास विभाग, महसूल व वन विभाग,गृह निर्माण विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, माहिती व जनसंपर्क विभाग, विधी व न्याय विभाग, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, सामान्य प्रशासन विभाग,सार्वजनिक बांधकाम विभाग, वित्त विभाग, सांस्कृतिक कार्य विभाग, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, अन्न व नागरी पुरवठा, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | पदसिध्द सदस्य |
| ३ | ज्येष्ठ नागरिकांचे कल्याण या क्षेत्रातील तज्ज्ञ व कार्यकर्ते | सदस्य |
| ४ | विख्यात ज्येष्ठ नागरिक (पदसिध्द सदस्यांच्या संख्येपेक्षा कमी नाही इतके प्रतिनिधी) | सदस्य |
| ५ | आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे | पदसिध्द सदस्य सचिव |

२. **ज्येष्ठ नागरिक राज्य परिषदेची कार्ये-**

१) ज्येष्ठ नागरिकांच्या अधिनियमाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सल्ला देणे.

२) ज्येष्ठ नागरिकांच्या कल्याण योजना व समस्यांचा साकल्याने विचार करुन ज्येष्ठ नागरिकांचे कल्याणासाठी कार्यक्रम आखण्याबाबत कार्यवाही करणे.

३) ज्येष्ठ नागरिकांच्या संदर्भात राज्य शासन विनिर्दिष्ट करेल अशी इतर कर्तव्य पार पाडणे.

३. उपरोक्त ज्येष्ठ नागरिक राज्य परिषदेमधील पदसिध्द सदस्य वगळता इतर सदस्यांचा कार्यकाल किमान १ वर्षाचा किंवा जोपर्यंत राज्य शासन सदरची ज्येष्ठ नागरिक राज्य परिषद बरखास्त करीत नाही तोपर्यंत राहील.

४. सदर राज्य परिषदेची बैठक सहा महिन्यातून एकदा आयोजित करण्यात येईल.

५. सदर बैठकीला ज्येष्ठ नागरिक सदस्यांना बैठक भत्ता रु.५०० (रुपये पाचशे फक्त) राहील. तसेच मुंबई/नवी मुंबईसह बाहेरुन येणा-या ज्येष्ठ नागरिकांना बैठकीसाठी केलेल्या प्रवासखर्चाची देयके सादर केल्यानुसार एस.टी बस/थ्री टायर ए.सी चे प्रवासभाडे रोखशाखेमार्फत अदा करण्यात येईल.

सदरचा खर्च मागणी क्र. एन-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण राज्य स्तरीय ) (०९) (०१) ज्येष्ठ नागरिकांच्या योजनांची जाहिरात व प्रसिध्दी (२२३५ बी ३१६) या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९१०३११६०३५०१७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2019.10.31 16:06:09 +05'30'

**( सं. गि. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री ( सर्व) यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
५) सर्व अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
६) सर्व प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग) मंत्रालय,मुंबई
७) मा.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई
८) सर्व विभागीय आयुक्त
९) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
१०) सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व पोलीस अधिक्षक
१३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
१४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१५) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१६) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जि.प.
१७) प्र.स. (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक
१८) निवडनस्ती.